कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२०/५९/प्र.क्र.१४/र-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७/४/२०१५.
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१८/४००/प्र.क्र.१०६/र-८, दि.२२/११/२०१८
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.पुनर्व-२०१९/६/प्र.क्र.५/र-८,दि. ०७/०३/२०१९.
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१/०४/२०१९
७) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/१३६,१३७/प्र.क्र.३१/र-८, दि.२८/०५/२०१९.
८) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/५/प्र.क्र.०४/र-८,दि.१९/०९/२०१९
९) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/३०१/प्र.क्र.६७/र-८,दि.१९/०९/२०१९.
१०) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/३०४/प्र.क्र.६९/र-८,दि.१९/०९/२०१९
११) कार्यकारी अभियंता,कण्हेर कालवे विभाग क्र.२,करवडी (कराड), जि.सातारा यांचे पत्र क्र.ककावि-४/लेशा-२/४९७/२०२०, दि.०६/०२/२०२०
१२) कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र.२, करवडी (कराड), जि.सातारा यांचे पत्र क्र.ककावि-२/लेशा-४/२५४९/२०२०, दि.३१/०८/२०२०

प्रस्तावना-

कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४,५,७,८,९ व १० येथील आदेशांन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली असून प्रस्तावित कामांना यापूर्वी निधी वितरित करण्यात आलेला नाही. प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या कामांपैकी पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील कामांना नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठीचानिधी मागणी प्रस्ताव कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र. २, करवडी (कराड), जि.सातारा यांनी सादर केला आहे.

२. प्रकल्प यंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, प्रस्तावाधिन प्रगतीपथावरील कामाकरिता उपलब्ध निधी विचारात घेऊन प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

शासन निर्णय-

त्यानुसार, कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटणतालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी एकूण रु. २,७२,११,५००/- एवढा निधीसन २०२०-२१ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, कोयना प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील खालील विवरणपत्रात नमूद प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.२,७२,११,५००/- (रुपये दोन कोटी बाहत्तर लक्ष अकरा हजार पाचशे फक्त) "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) (कार्यक्रमावरील खर्च)" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहेः-

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरित करावयाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | तळोशी-कोंडावळे | बस थांबा | २,५६,४०८/- |
| २ | चिरंबे-मणेरी | स्मशानभूमी शेड | २,११,६१०/- |
| ३ | हुंबरळी-देशमुखवाडी | बस थांबा | २,५४,५५५/- |
| ४ | गोजेगाव-वांझोळे | स्मशानभूमी शेड | २,१०,०४९/- |
| ५ | आंबेघर-रासाटी | स्मशानभूमी शेड | २,१०,४६३/- |
| ६ | आंबेघर-रासाटी | बस थांबा | २,५३,४२९/- |
| ७ | झाडोली-नेचल | बस थांबा | २,५९,७७८/- |
| ८ | कामरगाव गोकुळ (एस) | पोहोच रस्ता डांबरीकरण | ३२,२५,७३८/- |
| ९ | नवजा (ढाणकल) | अंतर्गत रस्ते तयार करणे | १३,५३,९८०/- |
| १० | हुंबरळी (देशमुखवाडी) | अंतर्गत रस्ते तयार करणे | १२,३६,२९०/- |
| ११ | बाजे (व.स.) | समाजमंदीर बांधणे | ६,५५,२३९/- |
| १२ | ढोकावळे रिसवड | पोहोच रस्ता डांबरीकरण कि.मी. ३ व ४, मोरी बांधकाम | ४९,०३,१७१/- |
| १३ | जुंगटी (दिवशी) | ग्रामपंचायत कार्यालय | १९,२६,६५३/- |
| १४ | ढोकावळे-रिसवड | स्मशानभूमी शेड व पोहोच रस्ता करणे | ३,३८,६३०/- |
| १५ | मानाईनगर | बस थांबा | २,८८,६६३/- |
| १६ | हुंबरळी (व.स.) | बस थांबा | २,८५,७७९/- |
| १७ | कामरगाव (व.स.) | मोरी बांधकामे व डांबरीकरण | ११,६५,९१६/- |
| १८ | बाजे (व.स.) | पुल बांधकाम (पोहोच रस्ता) | २८,७१,७६०/- |
| १९ | बाजे (व.स.) | ग्रामपंचायत कार्यालय इमारत | १३,६७,३०३/- |

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरित करावयाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| २० | कुसवडे झाकडे | अंतर्गत मार्ग (संधाणकीकरण) | १०,०१,६८६/- |
| २१ | देवघर गोवारे | ग्रामपंचायत कार्यालय | १३,५९,७२८/- |
| २२ | दास्तान (रासाटी) | ग्रामपंचायत कार्यालय इमारत | १३,६६,६३८/- |
| २३ | मिरगांव चाफेर | आर.सी.सी.गटार बांधणे | ८,६१,२८५/- |
| २४ | मिरगांव चाफेर | अंतर्गत रस्ते तयार करणे | १३,४६,७४९/- |
| | | **एकूण -** | **२,७२,११,५००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांनी नागरी सुविधा व तदनुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकतानाही.

४) कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र.२, करवडी (कराड), जि.सातारा यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२०-२०२१ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

४. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२० नुसार वित्त विभागाशी सल्लामसलत करण्यात आला असून, वित्त विभागाने प्रस्तुत योजनेखाली निधी वितरित करण्यास अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०२/२०२०, दिनांक-१०.०८.२०२० नुसार सहमती दर्शविली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१६१७२५४१९४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand Shankarappa Munjale

Digitally signed by Dayanand Shankarappa Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand Shankarappa Munjale
Date: 2020.09.16 17:26:53 +05'30'

**( दयानंद शं. मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग, पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सातारा

४. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
५. कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवे विभाग क्र.२, करवडी (कराड), जि.सातारा
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.
११.नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३.महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१४.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****